**उपनियंत्रक, वैध मापन शास्त्र, मेरी वसाहत, दिंडोरी रोड,नाशिक या कार्यालयाचे इमारतीची दुरुस्ती/नुतनीकरण करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा २०२२/प्र.क्र.२९/ग्रासं-३**

दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- २०/०२/२०२३

**संदर्भ :-** नियंत्रक, वैध मापन शास्त्र महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. कार्या.जागा (२८)/१६२२/प्र.क्र.१८/वैमाशा-२/१४१८, दि. १७/११/२०२२.

**शासन निर्णय-**

नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भिय पत्रान्वये उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक जिल्हा या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती/नुतनीकरण करण्यासाठी रु.७४,११,०००/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक शासनास सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारित असून त्यास कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक यांची मान्यता घेण्यात आली आहे. सदर अंदाजपत्रक मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या शिफारशीसह प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केलेले आहे.

२. उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक जिल्हा या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती/नुतनीकरण करण्यासाठी रु. ७४,११,०००/- (रु.चौऱ्याहत्तर लाख अकरा हजार फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर प्रयोजनार्थ उपनियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक जिल्हा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी सदर निधी आहरीत करुन कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांचेकडे वर्ग करावा.

४. उपरोक्त खर्च मुख्य लेखाशीर्ष ५४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च (८००) इतर खर्च (००) (०१) वजने व मापे यांच्या मुलभूत सुविधांचे बळकटीकरण (कार्यक्रम) (५४७५०२४८), ५३ मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षाकरिता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग, शासन निर्णय दि. १७ एप्रिल २०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग ५, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत, अनुक्रमांक १०, परिच्छेद क्र. १३४ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिरक्षणासाठी ताब्यात नसलेल्या इमारतीच्या सर्वसाधारण दुरुस्ती व विशेष दुरुस्तीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे पूर्ण अधिकार प्रशासनिक विभागास आहेत. सदर अधिकारानुसार उपरोक्त शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०२२०११५०५१९८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B9E0C912BDFBC8224F1554BA0BC93342824E4FAA118ED64C79AC40826E1611B3, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2023.02.20 11:55:48 +05'30'

**( शे. भा. कुटे )**

कक्ष अधिकारी

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

**प्रत-**

१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
३. महालेखापाल, १, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४. महालेखापाल-१,(लेखा व परिक्षा), मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६. सह नियंत्रक, वैघ मापन शास्त्र, नाशिक विभागीय कार्यालय, नाशिक
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक
८. उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक.